**महाराष्ट्र विकास सेवा गट - अ मधील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / प्रकल्प संचालक पदावरील अधिकाऱ्यांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गात तदर्थ पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१८/प्र.क्र.२६८/२०१८/आस्था-३,**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ३० मार्च, २०२०.

**वाचा :** १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.मविसे-१०/प्र.क्र.२५८/२०१२/आस्था-३, दिनांक २५.१०.२०१३.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक २८.०४.२०१५.
३) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५.
४) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/का.१२, दिनांक १५.६.२०१७.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / प्रकल्प संचालक या संवर्गातील (वेतन स्तर एस-२५ : ७८८००-२०९२०० ) खालील नमूद अधिकाऱ्यास अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी निवडश्रेणी या संवर्गात (वेतन स्तर एस -२७ : ११८५००-२१४१०० ) तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.१५६/ का.१२, दिनांक २८.०४.२०१५, शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५ आणि शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/ का.१२, दिनांक १५.६.२०१७ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत

केलेल्या महसुली विभाग वाटप (दुसरी सुधारणा) नियम, २०१७ मधील तरतूदींच्या अधीन नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच शासनाच्या मान्यतेने खालील तक्त्यातील अधिकाऱ्यास त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याचे पदनाम | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.सय्यद एक्तेजा अहमद हाश्मी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी), जिल्हा परिषद, गोंदिया | रिक्त पदी |

२. वरील अधिकाऱ्यास अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गात खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे :-

अ) सदर अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील तदर्थ पदोन्नती ही रिट याचिका क्रमांक T.A.No.१/२०१४, T.A.No.२/२०१४ (रिट याचिका क्रमांक ८४५२/२००४) यासंदर्भात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिलेल्या निर्णयाविरुध्द मा .उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दिलेल्या स्थगितीच्या अधीन राहून देण्यात येत आहे .तसेच सदर तदर्थ पदोन्नती मा .सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून देण्यात येत आहे.

ब) सदर अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी निवडश्रेणी संवर्गातील तदर्थ पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

क) वरील अधिकाऱ्यांना देण्यात येणारी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी निवडश्रेणी संवर्गातील तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या वरील अधिकाऱ्यास स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन , तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित अधिका-यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर

करावा.

४. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी निवडश्रेणी संवर्गातील तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्याने नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. **"त्यांना उपरोक्त तक्त्यातील रकाना क्र.३ येथील नमूद पदावर रुजू झाल्याशिवाय पदोन्नती लागू होणार नाही"** त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच दिलेली नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये . तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०१६०१५९०६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PANDIT KAHANDERAO JADHAV

Digitally signed by PANDIT KAHANDERAO JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f5c40942371a6969108d4d7e802129ea5f7a19f482726930e17fe1f06ad5cc76, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PANDIT KAHANDERAO JADHAV
Date: 2020.03.30 18:38:16 +05'30'

( पं.खं.जाधव )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा. मंत्री ( ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
३) मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
४) मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक,
५) विभागीय आयुक्त, नागपूर,
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया,
७) जिल्हा कोषागार अधिकारी(संबंधीत),
८) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
९) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत),
१०) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१.